शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व कर्करोग रुग्णालय, औरंगाबाद या संस्थेस स्लाईस १२८ सिटी स्कॅन मशिन खरेदीस सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,
शासन निर्णय, क्रमांक : जीसीए-२०१८/प्र.क्र.१३७/प्रशा-१,
गोकुलदास तेजपाल रुग्णालय आवार, नवीन गो.ते.संकुल,
९ वा मजला, मंत्रालय, मुंबई -४०० ००१.
दिनांक : १८ जुलै, २०२३

वाचा :
१) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र.भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/उद्योग-४, दिनांक ०१.१२.२०१६
२) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्र.खरेदी-२०१६/प्र.क्र.२४०/आरोग्य-८, दिनांक २६.०७.२०१७
३) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र.संकीर्ण-२०१४/प्र.क्र.२१५/ उद्योग-४, दिनांक २४.०८.२०१७
४) वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, शासन निर्णय, समक्रमांक दि.३१.०३.२०१८
५) आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई यांचे पत्र क्र.डीएमईआर-२२०११/१५८/ २०२३-पीआरओसी१, दिनांक २१.०६.२०२३

प्रस्तावना :

शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व कर्करोग रुग्णालय, औरंगाबाद या संस्थेस आवश्यक असलेले स्लाईस सिटी स्कॅन मशिन १२८ खरेदीस दिनांक ३१.०३.२०१८ च्या शासन निर्णयान्वये मान्यता प्रदान करण्यात आली होती. सदर यंत्र खरेदीस दिलेल्या प्रशासकीय मान्यतेचा विधी ग्राह्यता एक वर्षापेक्षा अधिक झालेला असून नवीन आदेश काढणे आवश्यक असल्याने सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :

शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व कर्करोग रुग्णालय, औरंगाबाद या संस्थेस आवश्यक असलेले खालील तक्त्यात नमूद रुपये ८,००,००,०००/- (रुपये आठ कोटी फक्त) इतक्या रक्कमेच्या स्लाईस सिटी स्कॅन १२८ मशिन खरेदी करण्यास या शासन निर्णयान्वये पुढील अटींच्या अधीन राहून सुधारित प्रशासकीय मंजूरी देण्यात येत आहे.

| दि.३१.०३.२०१८ च्या शासन निर्णयातील अ.क्र. | संस्थेचे नाव | यंत्राचे नाव | नग | प्रति नग किंमत | एकूण किंमत |
|---|---|---|---|---|---|
| १ | शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व कर्करोग रुग्णालय, औरंगाबाद | १२८ स्लाईस सिटी स्कॅन मशिन | १ | ८,००,००,००० | ८,००,००,००० |
| एकूण | | | | | ८,००,००,००० |

अटी :-

१) सदर यंत्रसामुग्री हाताळण्यासाठी नव्याने पदनिर्मितीची आवश्यकता नाही, याबाबत संचालनालयाने व संबंधित अधिष्ठाता यांनी खातरजमा करावी.

२) सदर विषयी "शासकीय विभागाने करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची नियमपुस्तिका" याबाबत उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाने निर्गमित केलेल्या शासन निर्णय क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/उद्योग-४, दिनांक ०१.१२.२०१६ व अनुषंगिक शासन निर्णयांमध्ये नमूद केलेल्या विहीत कार्यपध्दतीचे अनुपालन करण्यात यावे.

३) सदर यंत्रसामुग्रीची आवश्यकता असल्याचे व त्याची किंमत बाजारभावापेक्षा जास्त नसल्याची खात्री आयुक्त (वैद्यकीय शिक्षण) व अधिष्ठाता यांनी करावी.

४) सदर साधनसामुग्रीची विनिर्दिष्टे व्यापक, सर्वसमावेशक असून त्यानुसार साधनपुरवठा करु शकणारे किमान तीन उत्पादक / पुरवठादार यांचेकडून तीन निविदा प्राप्त होऊ शकतील अशा प्रकारची आहेत, असे आयुक्त (वैद्यकीय शिक्षण) यांनी प्रमाणित करावे.

५) प्रस्तावित यंत्रसामुग्री साहित्याचा समावेश इतरत्र कोणत्याही प्रस्तावात अंतर्भूत केलेला नसल्याबाबत व सदर साधनसामुग्री संबंधित संस्थेस आवश्यक असल्याबाबत आयुक्त (वैद्यकीय शिक्षण) व अधिष्ठाता यांनी खात्री करावी.

६) मुख्य यंत्र व त्यांचे सुटे भाग (Accessories) यांच्या किंमती भिन्न दर्शविणे आवश्यक राहील.

७) सदर यंत्रसामुग्री केंद्र शासनाने संबंधित योजनेंतर्गत मान्य केलेल्या यादीत नमूद आहे, याची खातरजमा संस्थाप्रमुखांनी केलेली आहे.

८) सदर विषयी केंद्र-राज्य शासनाकडून उपलब्ध करुन देण्यात येणा-या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र वेळोवेळी केंद्र शासनास विहित कार्यपद्धतीने सादर करण्याची जबाबदारी संबंधित संस्थेचे अधिष्ठाता यांची राहिल.याबाबत संबंधित संस्था संचालनालयामार्फत शासनास अनुपालन अहवाल सादर करेल.

९) सदर विषयी साधनसामुग्री खरेदीबाबत निर्णय घेताना प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आलेल्या लेखाशीर्षाखाली मंजूर अनुदानाच्या तरतूदीपेक्षा जास्त खर्च केला जाणार नाही याची दक्षता घ्यावी.

१०) उपरोक्त शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, दिनांक ०१.१२.२०१६ मधील परिच्छेद क्रमांक ३.१.२ "किंमतीचा अंदाज व किंमतीचा वाजवीपणा" या शीर्षकाखालील परिच्छेद क्रमांक ३.१.२.१ मधील तरतूदीचे राज्यस्तरीय खरेदी समितीने अनुपालन करावे. सदर तरतूदीचे अनुपालन केलेल्या यंत्रसामुग्रीच्या / साधनसामुग्रीच्या किंमतीस आवश्यकतेनुसार सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात येईल.

२. या प्रयोजनासाठी येणारा खर्च खालील लेखाशीर्षातंर्गत मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व कर्करोग रुग्णालय, औरंगाबाद

मागणी क्रमांक : एस-०४

| | | |
|---|---|---|
| ४२१० | - | वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य यावरील भांडवली खर्च |
| ०३ | - | वैद्यकीय शिक्षण, प्रशिक्षण व संशोधन |
| १०५ | - | विषम चिकित्सा |
| (००) (५१) | - | कर्करोग,मधुमेह, हृदयविकार आणि आघात यावरील प्रतिबंध व नियंत्रणबाबतचा राष्ट्रीय कार्यक्रम (केंद्र शासन हिस्सा ६०%) ४२१० २५८१ |

३. सदर शासन निर्णय, वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक : विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/ विनियम, दिनांक १७.०४.२०१५ तसेच वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८, भाग-१, उप विभाग-२, अनुक्रमांक-३, नियम क्रमांक-७ अनुसार प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०७१८१०४९४७६५१३ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SUDHIR JAYA SHETTY

Digitally signed by SUDHIR JAYA SHETTY
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, 2.5.4.20=72ea277025fdf5a4898b244953b82406eea05963bc456f1e1e8621e5917d8305, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E9D37D499A521B728AEB3DC8EC38B759420308B9FD7816002B4AF0FFBF1111D7, cn=SUDHIR JAYA SHETTY
Date: 2023.07.19 13:02:10 +05'30'

( सुधीर जया शेट्टी )

कार्यासन अधिकारी , महाराष्ट्र शासन

प्रति,

१. आयुक्त (वै.शि.), वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई.
२. महालेखापाल-२ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर.
३. संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई.
४. अधिष्ठाता,शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व कर्करोग रुग्णालय,औरंगाबाद.
५. जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद.
६. निवडनस्ती (प्रशा-१).